स्थानिक स्वराज्य संस्था (महानगरपालिका/ नगरपरिषद/जिल्हा परिषद, पोलिस वेल्फेअर, आर्मी वेल्फेअर) यांनी नवीन शाळा सुरु करण्यासंदर्भात....

**पोलिस वेलफेअर अंतर्गत पोलीस पब्लिक स्कूल, अमरावती या इ.१ ली ते ७ वी च्या शाळेस जोडून माध्यमिक (इ.८ वी ते इ. १० वी) स्वंयअर्थसहाय्यित तत्वावर दर्जावाढ देण्याबाबत.....**

महाराष्ट्र शासन
**शालेय शिक्षण व क्रिडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसएफएस-१०२४/प्र.क्र.३८१/एसएम- २**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २८ जून, २०२४.

वाचा -

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक: नमाशा-२००९/(४९७/०९)/ माशि-१, दिनांक ११ जून, २००९.
२) शिक्षण उपसंचालक, अमरावती यांचे पत्र क्र. शिउसं/ माध्य/क/५७७४/२०२३, दि.२२.०६.२०२३.

**प्रस्तावना :-**

पोलीस वेल्फेअर अंतर्गत पोलीस पब्लिक स्कूल, अमरावती या शाळेस स्वंयअर्थसहाय्यित तत्वावर शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून स्वंयअर्थसहाय्यित तत्वावर दर्जावाढ मिळणेबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. (२) अन्वये शासनास प्राप्त झाला होता. सदर शाळेस स्वंयअर्थसहाय्यित तत्वावर दर्जावाढ परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ (सन २०१३ चा ०१) अंतर्गत पोलीस वेल्फेअर अंतर्गत पोलीस पब्लिक स्कूल, अमरावती शाळेस दर्जावाढ सन २०२४-२५ या शैक्षणिक वर्षापासून खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन स्तरावरुन परवानगी देण्यात येत आहे.:-

| अ.क्र. | शाळेचे नाव व पत्ता | माध्यम | मंडळ | शाळेचा प्रकार |
|---|---|---|---|---|
| १ | पोलीस वेल्फेअर अंतर्गत पोलीस पब्लिक स्कूल, पोलीस मुख्यालय अमरावती शहर. | इंग्रजी | राज्यमंडळ | दर्जावाढ, प्राथमिक ते उच्च प्राथमिक शाळेस जोडून माध्यमिक (इ. ८ वी ते इ. १० वी) |

**अटी व शर्ती :-**

I. सदर प्राथमिक शाळेस आवश्यक व यापुढे येणाऱ्या कोणत्याही खर्चाकरिता, राज्य शासनाकडून प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष असे कोणतेही वित्तीय सहाय्य / अनुदान उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

II. प्राथमिक शाळांबाबतचे शासनाचे प्रचलित धोरण व निकष यांचे पालन करणे तसेच शाळेमध्ये आवश्यक वर्गखोल्या, सर्व भौतिक व शैक्षणिक सुविधा उपलब्ध करुन देणे अनिवार्य राहील.

III. महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ अन्वये निर्धारित केलेल्या सर्व मानकांचे, अटींचे व शर्तींचे आणि या अधिनियमांन्वये शासनाने दिलेल्या निदेशांचे किंवा शासनाने वेळोवेळी विनिर्दिष्ट केलेल्या मानकांचे किंवा अटीं व शर्तींचे पालन करणे अनिवार्य राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६२८१५३८४६२१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK GULABRAO SAPKAL

Digitally signed by VIVEK GULABRAO SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=55c54ce6c9bede7daecd096d20450a76c60783cb1318374f8764a2da64d548a5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50EDF35541F970C25C79ED803C981C8C9EBC19E27CDBAD124BB5C63AA9962A6B, cn=VIVEK GULABRAO SAPKAL
Date: 2024.06.28 15:49:26 +05'30'

**( विवेक सपकाळ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
३. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. विभागीय शिक्षण उपसंचालक, पुणे विभाग, पुणे.
५. आयुक्त, अमरावती महानगरपालिका, अमरावती.
६. शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक), जिल्हा परिषद, अमरावती.
७. निवडनस्ती (३८१/२०२४/एसएम-२).